**To Obtain Sanction for Purchase/Sale of Movable or Immovable Assets.**

**स्थावर/जंगम मालमत्ता खरेदी/विक्री करण्यास परवानगी मिळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन परिपत्रक क्र.मवदा-२०११/२७९/२०११/दक्षता-२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २०/१२/२०११

## -: परिपत्रक :-

जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता, अधिक्षक अभियंता व इतर वरिष्ठ अधिका-यांकडून सदनिका खरेदी/विक्री, कार खरेदी/विक्री, शेतजमिन खरेदी/विक्री इत्यादी स्थावर/जंगम मालमत्तेबाबतच्या खरेदी/विक्री करण्यास परवानगी मिळण्याबाबत किंवा सदर व्यवहाराची नोंद घेण्याबाबतचे प्रस्ताव शासनाकडे प्राप्त होतात. तसेच मालमत्ता खरेदी/विक्री केल्यानंतर सदर व्यवहारास कार्योत्तर मंजुरी देण्याबाबतचे प्रस्ताव उपरोक्त अधिका-यांकडून प्राप्त होत असतात. सदरहू प्रस्ताव महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम १९ (२) तरतुदीअन्वये तपासून त्यास मान्यता दिली जाते, व व्यवहाराची शासन स्तरावरुन नोंद घेतली जाते. उपरोक्त अधिका-यांकडून शासनाकडे प्राप्त होणा-या प्रस्तावात अनेक त्रुटी असल्याचे निदर्शनास येते. त्यामुळे अशा प्रस्तावांची शासन स्तरावर तपासणी करणे वेळखाऊ ठरत आहे. सदर प्रस्ताव पाठविण्यापूर्वी खालीलप्रमाणे दक्षता घेण्याबाबत उपरोक्त अधिका-यांना कळविण्यात येत आहे.

१. शासकीय कर्मचारी/अधिकारी यांनी स्वतः किंवा त्यांचे संबंधित कोणताही (स्थावर/जंगम मालमत्ते बाबत किंवा अन्य) आर्थिक व्यवहारार करताना (कुटुंबासंबंधीत/नातेवाईका संबंधीत/अन्य कोणत्याही व्यक्तीसंबंधीत इ.) त्या व्यवहारासाठी उभारावयाच्या आर्थिक निधीचे स्त्रोत सविस्तरपणे नमूद करणे आवश्यक आहे. सदर व्यवहारापूर्वी पूर्व मंजूरी मागताना किंवा व्यवहाराबाबत कार्योत्तर मंजूरी मागताना संबंधीत कर्मचा-यांनी/अधिका-यांनी वरीलप्रमाणे तपशील अर्जामध्ये सादर करणे आवश्यक आहे. तसेच आवश्यकतेनुसार त्या संबंधीच्या कागदपत्रांच्या प्रती (Supporting document) अर्जासोबत जोडाव्यात.(उदा.संबंधितांची प्रतिज्ञापत्र, Income Tax returns च्या प्रती इ.)

२. उपरोक्त नियमात कार्योत्तर मंजूरीची तरतूद नसल्यामुळे असा व्यवहार करण्यापूर्वी शासनाची पूर्व परवानगी घेणे अथवा शासनास कळविण्याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१११२२००६१७५६१२५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**( ग.शा.सोनवणे )**

**शासनाचे अवर सचिव**

प्रत,

प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई ३२.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई ३२.
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ जळगांव.
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ औरंगाबाद.
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ ठाणे.
सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व मुख्य अभियंता , जलसंपदा विभाग,
सर्व अधिक्षक अभियंता व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई.
सर्व अधिक्षक अभियता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यकारी अभियंता व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मुंबई.
सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
दक्षता-२, कार्यासन संग्रहार्थ.